प्रतिबंधक स्थानबध्दता अधिनियमांतर्गत
स्थापन करण्यात आलेल्या सल्लागार
मंडळाच्या सदस्यांना देय असलेल्या
मानधनामध्ये वाढ करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक - संकिर्ण २०१०/प्र.क्र.१०६/विशा - ३ (अ)
मंत्रालय मुंबई - ४०० ०३२,
दिनांक २७ डिसेंबर, २०११

वाचावे : १) शासन निर्णय,गृह विभाग, क्र. - पीएसए ०२७९/११/विशेष - ३, दि. २३.११.१९७९
२) शासन निर्णय,गृह विभाग, क्र. - एमआयएस २००१/प्र.क्र.२२/विशा - ३ ब, दि. १८.३.२००२
३) शासन शुध्दीपत्रक गृह विभाग, क्र.-एमआयएस २००१/प्र.क्र.२२/विशा - ३ ब, दि.४.२.२००३

शासन निर्णयः-

गृह विभागाच्या अंतर्गत असलेल्या विविध प्रतिबंधक स्थानबद्धता अधिनियमांतर्गत स्थापन करण्यात आलेल्या सल्लागार मंडळाच्या सदस्यांना संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयानुसार त्यांच्याकडे सुनावणीसाठी आलेल्या स्थानबद्धतेच्या प्रत्येक प्रकरणी रु. ४०० (प्रत्येकी) व स्थानबद्ध सुनावणीसाठी उपस्थित न राहिल्यास रु. ३००/- (प्रत्येकी) मानधन देण्यात येत होते. या मानधनाच्या रक्कमेमध्ये वाढ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सल्लागार मंडळाच्या सदस्यांना देय असलेल्या मानधनाच्या रक्कमेमध्ये आता सुधारणा करण्यात येत असून खालील प्रमाणे सुधारीत मानधन देण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | बाब | मानधनाची सुधारित रक्कम |
|---|---|---|
| १ | स्थानबद्धता सुनावणीसाठी | रु. १०००/- (प्रत्येकी) - (कमाल रु. ४०००/- प्रति दिवस) |
| २ | स्थानबद्धता सुनावणीसाठी उपस्थित नसेल तेव्हा | रु. ७५०/- (प्रत्येकी) |

२. सुधारीत मानधन या आदेशाच्या दिनांकापासून अंमलात येईल.

३. यावर होणारा खर्च, मागणी क्र. बी-४, मुख्य लेखाशिर्ष- २०५२, सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा ०९० -(००)(०३) सल्लागार मंडळ (२०५२ ०१९७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्या खालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं.क्र. १९५ / सेवा -६, दि.६.६.२०११ व अनौ. सं.क्र.४१९/व्यय-७, दि. ११.७.२०११ अन्वये दिलेल्या संमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१११२२८०५१६२३१२२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचया आदेशानुसार व नावाने

(पु. हि. वागदे)
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

न्यायमूर्ती श्री. डी. डी. सिन्हा
अध्यक्ष कॉफेपोसा कायदा १९७४ व
एम.पी.डी.ए. कायदा १९८१

D:\deshpande\GR 2011CR 106.lwp

सल्लागार मंडळे (पत्राने)
मा. न्यायमूर्ती श्री. बी.व्ही.चव्हाण, सदस्य, एम.पी.डी.ए. कायदा १९८१ व
कॉफेपोसा कायदा १९७४ सल्लागार मंडळे (पत्राने)
न्यायमूर्ती श्री. आर. जी. सिंधकर, सदस्य, एम.पी.डी.ए. कायदा १९८१ व
कॉफेपोसा कायदा १९७४ सल्लागार मंडळे (पत्राने)
अवर सचिव, विशेष शाखा कार्यासन - ३ ब, मंत्रालय, मुंबई - ३२
कक्ष अधिकारी, कर्यासन एचडीओ-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
कक्ष अधिकारी, सल्लागार मंडळ, (कार्यासन विशा-१०), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
अवर सचिव, बीयूडी-१, नवीन प्रशासन भवन, १२ वा मजला, मंत्रालय, मुंबई - ३२
महालेखापाल-१, (लेखा परिक्षा लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
वित्त विभाग, (सेवा-६ / व्यय-७) मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती, कार्यासन विशा-३ अ